**महात्मा ज्योतिबा फुले यांच्या जीवनावर चित्रपट निर्मिती करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्र. मावज-२०१८/प्र.क्र.२९६/का.३४**
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक:- १३ नोव्हेंबर, २०१८

**वाचा :** १) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र.मावज २००१/६७७/७७/२००१/३४, दिनांक १५ मार्च, २००३.
२) सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्र.मावज २०१३/प्र.क्र.१४३/३४, दिनांक ९ मार्च, २०१८

**प्रस्तावना :-**

महात्मा ज्योतिबा फुले यांच्या जीवनकार्यावर आधारित पूर्ण लांबीचा चित्रपट निर्माण करण्याचा निर्णय मंत्रिमंडळाच्या बैठकीत घेण्यात आला होता. व त्याच अनुषंगाने संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये त्यास शासन मंजूरी देण्यात आली. या चित्रपट निर्मितीची जबाबदारी राष्ट्रीय चित्रपट विकास महामंडळाकडे सोपविण्यात आली होती. तथापि राष्ट्रीय चित्रपट विकास महामंडळाने या प्रकरणी लावलेला विलंब लक्षात घेता हा चित्रपट विशिष्ट कालावधीमध्ये पूर्ण करण्यासाठी खुल्या बाजारातून ई-निविदा मागवून योग्य संस्थेची निवड करुन त्या संस्थेमार्फत चित्रपटाच्या निर्मितीचे काम पूर्ण करण्यासाठी होणा-या खर्चास क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यांत आली होती. आता सदर **शासन निर्णय क्र.मावज-२०१३/प्र.क्र.१४३/३४, दिनांक ९ मार्च, २०१८** हा अधिक्रमित करुन पुढील प्रमाणे सुधारीत शासन निर्णय निर्गमित करण्यांत येत आहे.

**शासन निर्णय:-**

महात्मा ज्योतिबा फुले यांच्या जीवनकार्यावर आधारित चित्रपट निर्मितीची जबाबदारी राष्ट्रीय चित्रपट विकास महामंडळाकडे सोपविण्यात संदर्भातील संदर्भाधीन दि. १५ मार्च, २००३ चा शासन निर्णय रद्द करण्यांत येत आहे.

२. महात्मा ज्योतिबा फुले यांच्या जीवन कार्यावर आधारित चित्रपट निर्माण करण्याकरिता खुल्या बाजारातून ई-निविदा प्रक्रिया राबवून चित्रपट निर्माण करुन त्याचे वितरण करण्यासाठी येणाऱ्या

रु.२०.०० कोटी इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. चित्रपट निर्मितीचा संपूर्ण खर्च राज्य शासनाकडून करण्यात येईल. त्याची अंदाजित विगतवारी पुढील प्रमाणे राहील.

| **अ.क्र.** | **तपशील** | **खर्च** |
|---|---|---|
| १. | संशोधन/संहिता लेखानासाठी पूर्वतयारी | रु.१,६०,००,०००/- |
| २. | परिपूर्ण संहिता प्रत देणे | रु.६०,००,०००/- |
| ३. | तंत्रज्ञ मानधन, कलाकार मानधन | रु.८०,००,०००/- |
| ४. | शूटींग मेटेरिअल खर्च, साधन-सामग्री भाडे, लोकेशन, सेट्स, शूट खर्च, वाहतूक/प्रवास आदी कामांसाठी | रु.९,००,००,०००/- |
| ५. | पोस्ट प्रोडक्शन-एडिटींग, डबींग, म्युझिक, सीनक्रॉनाईस-नॉन सीनक्रॉनाईस ईफेक्स, रि-रेकॉर्डींग, स्पेशल ईफेक्ट, ऑन टायटल, लॅबोरेटरी | रु.२,००,००,०००/- |
| ६. | अंतिम प्रत, सेन्सॉर, अनुषंगीक रिलीज प्लॅन, आराखडा | रु.२,००,००,०००/- |
| ७. | प्री-व्हू, प्रसिद्धी, प्रेस नोट, आकस्मिक | रु.२,००,००,०००/- |
| ८. | अंतिम रिलीज प्लॅन, प्रिमिअर शो, प्रसिद्धी | रु.२,००,००,०००/- |
| | **एकूण** | **रु.२०,००,००,०००/-** |

(वरील खर्चाची विगतवारी ही अंदाजित असून प्रत्यक्ष चित्रपटाच्या निर्मितीनुसार खर्चामध्ये फेरफार होऊ शकतो.)

३. चित्रपटाची निर्मिती ऐतिहासिक सत्याला धरुन होत असल्याची खात्री करणे, निर्मिती प्रक्रियेवर देखरेख ठेवणे यासाठी तज्ञ जाणकारांची समिती विभागाकडून गठीत करण्यांत आली आहे.

४. प्रस्तुत चित्रपट निर्मितीसाठी येणारा खर्च हा सामान्य प्रशासन विभाग, मागणी क्रमांक ए-०६, प्रधानशीर्ष क्र.२२२०-माहिती व प्रसिध्दी-०१ चित्रपट१०५-चित्रपटाची निर्मिती-(००)(०१) चित्रपटांची निर्मिती संगणक संकेतांक (२२२००३८४) (अनिवार्य) या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३१५/२०१८/व्यय-४, दि.१६.८.२०१८ अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संकेतांक २०१८१११३१३१४२७४९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ramkisan
Narayanrao
Musale

Digitally signed by Ramkisan Narayanrao Musale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e28f6332f6edfebdfb055bf154f99ec0b0d9e613209e20e7a215f026da6875ae, cn=Ramkisan Narayanrao Musale
Date: 2018.11.13 13:18:03 +05'30'

**( रा. ना. मुसळे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) सचिव, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
५) सर्व संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
६) मा.राज्यमंत्री (सा.प्र.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७) महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता)(लेखापरीक्षा), मुंबई, नागपूर,
८) उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
११) लेखाधिकारी (आहरण व संवितरण), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
१२) निवडनस्ती (का.३४), सामान्य प्रशासन विभाग.